

# एलिझाबेथ ब्लैकवेल

## अमेरिकेतील पहिली डाक्टर!

लेखक : ग्रांट




# एलिझाबेथ ब्लैकवेल

## अमेरिकेतील पहिली डाक्टर!

मराठी : गार्गी लागू

# एलिझाबेथ ब्लैकवेलचे जग





## एका नव्या जीवनाचा शोध

छोटी एलिझाबेथ वरच्या मजल्यावरच्या खिडकीच्या जवळ अवघडून बसली होती. बाहेर दंगल चालू होती. लोक आरडा-ओरडा करीत होते. आणि ब्रिस्टल, इंग्लंडच्या रस्त्यावर हातात मशाली घेऊन लूटमार करीत होते.ते इमारतींना आग लावित होते. पूर्ण शहर आगीत धुमसत होते. हे पाहून एलिझाबेथला भिती वाटत होती.



नंतर एलिझाबेथचे वडिल घरी आले तेव्हा त्यांनी लहानग्या एलिझाबेथला दंगलीचे कारण सांगितले. "ते गरीब लोक उपाशी आहेत. त्यांना वाटत की सरकार त्यांच्यावर अन्याय करीत आहे. आता त्या लोकांसमोर दंगल, हिंसा याशिवाय दुसरे काहीच साधन नाही."

सामुएल ब्लैकवेल साखरेचे श्रीमंत व्यापारी होते.पण ते सद्सदविवेकबुध्दीने विचार करणारे होते.त्यांना गरीब लोकांना मदत करण्याची इच्छा होती. पण कशी करणार? हे त्यांना कळत नव्हते. त्यांना ९ मुले होती. मुलांचा आपल्या वडिलांवर पूर्ण विश्वास होता.

ते १८३० साल होते. ब्लैकवेल कुटूंबावर गरीबीला तोंड द्यायची वेळ आली. त्यांचा व्यापार ठप्प झाला. त्यांनी विचार केला, "आपण आता अमेरिकेत जाऊ या आणि नव्याने सुरवात करू या"





ब्लैकवेल परिवाराने समुद्रांत जहाजावर पाऊल ठेवले तेव्हा एलिझाबेथने आपल्या लहान बहिणीचा हात घट्ट पकडून ठेवला होता. इंग्लंडचा किनारा सोडतांना तिने आपले मन काबूत ठेवले. हळूहळू किनारा मागे राहिला आणि चारहि दिशांना निळाशार समुद्र दिसू लागला.

जहाजावर कितीतरी गरीब प्रवासी होते. काही आजारी पडले, त्यातले काही मेले सुध्दा! मेलेल्या लोकांना वर आणले जात होते. प्रार्थना करून त्यांचे देह समुद्रांत फेकून देण्यात येत. एलिझाबेथला हे सर्व पाहून खूप वाईट वाटले. तिचे वडिल म्हणाले, "ते लोक गरीब असल्यामुळे मेले. ते स्वस्त तिकीटांवर खाली असलेल्या काळोखी कोठ्यामधून प्रवास करीत होते. दुसरा मार्गच नव्हता. पूर्ण जगात बरेच मरतात कारण ते गरीब असतात. आपण कसही करून त्यांना मदत केलीच पाहिजे.“

हे ऐकून केवळ ११ वर्षाच्या एलिझाबेथने संम्मतीदर्शक मान हलविली.





श्रीयुत ब्लैकवेल यांनी न्यू यार्कमधे साखरेचा व्यापर नव्याने सुरू केला. पण नंतर त्यांच्या आंतरमनाने दिलेल्या कौलामुळे त्यांनी तो बंद केला. ऊसाची शेती गुलामाकडून केली जात होती. हे तर गरीबांचे शोषण होते.

"अश्वेत गुलामांना स्वातंत्र मिळालच पाहिजे," श्री. ब्लैकवेल म्हणाले. "मी असा व्यापार कसा करू शकतो की जो गरीबांच्या शोषणावर चालू आहे ?" पण श्री. ब्बैकवेल यांना फक्त साखरेच्या व्यवसायाचीच माहिती होती. पुन्हा एकदा त्यांचा व्यवसाय ठप्प झाला. १८३७ मधे ब्लैकवेल परिवारासह सिनसिनाटी, ओहायोला गेले. तिथेच काही काळानंतर सॅमुएल ब्लैकवेल यांचा देहांत झाला.



## नोकरीची निकड

१६ वर्षाच्या एलिझाबेथला नोकरी करण्याची वेळ आली. त्याकाळात मुलींना कमी शिक्षण दिले जाई. पण त्या काळाला अनुसरून एलिझाबेथने चांगले शिक्षण घेतले होते. त्यामुळे तिला केंटकी येथील शाळेत शिक्षिकेची नोकरी मिळाली. तसेही तिचे वय लहान होते पण एलिझाबेथने खूप मेहेनत करून यशस्वी होण्याची प्रतिज्ञा केली होती.

पुरूष महिलांचा अवमान करीत ते एलिझाबेथला बिलकूल आवडत नसे. त्यावेळच्या अनेक प्रगतीशील स्त्रियांप्रमाणे ती महिलांच्या हक्कासाठी जागरूक होती.

महिलांना नोकरी करून आपले जीवनमान सुधारण्याचा अधिकार असू नये? त्यावेळी हुशार शिक्षिकेला, पुरूष शिक्षकापेक्षा कमी वेतन दिले जात असे. एलिझाबेथ शाळेतील पुरूष शिक्षकापेक्षा कमी जाणकार होती? ती तर पुरूष शिक्षकापेक्षा कितीतरी हुशार आणि मेहेनती होती. पण पुरूष शिक्षक तिला हे सिध्द करू देत नव्हते.

अशीच वर्ष उलटली. एलिझाबेथला वाटत होते की ती आयुष्य फुकट घालवित आहे. ती २४ वर्षांची असतांना तीला तिच्या मेरी नावाच्या मैत्रिणीला भेटायला जाव लागलं. ती आजारी होती. मृत्यूच्या छायेत होती.





मेरीने एलिझाबेथचा हात धरून म्हटले की, "एक अत्यंत असंवेदनाशील व उर्मट पुरूष डाक्टर माझ्यावर उपचार करीत आहे. माझ्यावर उपचार करण्यासाठी एखादी महिला डाक्टर असती तर किती बर झाल असतं"

एलिझाबेथला मेरीचे म्हणणे पटले.
मेरी एलिझाबेथला म्हणाली, "तू अजून तरूण आहेस. तू एक चांगली डाक्टर बनू शकतेस!"

## दार उघडलं .....

पण हे तर अशक्यच वाटत होतं. त्या काळात महिला डाक्टर होतच नसत. पण एलिझाबेथ आपल्या मृत्युशय्येवर असलेल्या मैत्रिणीचे शब्द विसरली नाही. काही महिने तिने खूप विचार केला. मग तिने आपल्या परिवाराला सांगितले की, "मी डाक्टर व्हायचा प्रयत्न करणार आहे'"

सुरवातीला एलिझाबेथला डाक्टरी शिकण्यासाठी एकाहि वैद्यकिय विद्यालयात प्रवेश मिळाला नाही. त्या काळात कुठल्याच विद्यालयात मुलींना प्रवेश देण्यात येत नसे. म्हणून सुरवातीला एलिझाबेथला स्वतंत्रपणे वैद्यकिय विषयाचा अभ्यास करावा लागला. क्वेकर्स डाक्टरांनी तिला मदत केली. क्वेकर्स डाक्टरांना महिलांवर विश्वास होता.

१८४७ मधे एलिझाबेथने जिनेवा वैद्यकिय विद्यालय, न्यू-यार्क, येथे अर्ज केला. विद्यालयाने गंमत म्हणून एलिझाबेथला प्रवेशही दिला. विद्यालयातील शिक्षक व इतर विद्यार्थी यांना वाटत होते की थोड्या दिवसांनी एलिझाबेथ कंटाळून निघून जाईल. मग सगळे तिची चेष्टा करतील.

त्या काळी चांगल्या कुलीन घरातील मुलींना रक्त पाहिले की चक्कर येत असे. शरीर कसे काम करते? याविषयी मुली अजिबात चर्चाहि करीत नसत. पण एलिझाबेथ खूप हुशार होती. तिची खात्री होती की ती कोणताही विषय सहज शिकू शकते.





जे पुरूष शिकत होते तेच एलिझाबेथ शिकत होती. जे पुरूष एलिझाबेथला हसत होते, तिची चेष्टा करीत होते तेच तिची हुशारी व मेहेनत बघून तिचा आदर करू लागले. पण जिनेवातील लोक एलिझाबेथला अजून एक आगाउ स्त्री समजत होते. कुणीहि तिच्याशी बोलत नव्हते.

उन्हाळ्याच्या सुट्टीत एलिझाबेथने फिलाडेल्फिया येथील अनाथालयात आजारी लोकांवर उपचार केले. त्या अनाथालयात शहरातील सर्वात गरीब लोक येत होते. त्या गरीब लोकांची सेवा करून एलिझाबेथला स्वत:च्या अज्ञानाची जाणिव झाली. "अजून मला खूप शिकायच आहे." ती मनाशी म्हणाली. "गरीबासाठी खूप काम करायची जरूर आहे, त्यासाठी मला इतर महिलांनाही प्रेरित करायला हवे"



त्यावर्षी पानझडीनंतर एलिझाबेथ परत वैद्यकिय विद्यालयात परतली. त्याकाळी डाक्टर पदवीसाठी विद्यालयात कमी काळासाठी जावे लागत असे. २३ जानेवारी १८४९ मधे एलिझाबेथ ब्लैकवेल अमेरिकेतील पहिली डाक्टर बनली.

त्यानंतर ती पॅरिसला गेली. तिथे तिने महिला व मुलांच्या आजारावर जास्त अभ्यास केला. एका मुलावर उपचार करतांना तिच्या एका डोळ्याला संसर्ग झाला व तिला एका डोळ्याची द्दष्टी गमवावी लागली.

पुढचे काही महिने वाईट गेले. एक तर तिला खूप त्रास होत होता आणि तिचा स्वत:वरील विश्वास कमी होऊ लागला.

त्यानंतर एलिझाबेथ इंग्लंडला गेली. तिथे तिची ओळख प्रसिध्द परिचारिका फ्लोरिंन्स नाइटिंगेल बरोबर झाली. १८५०मधे एलिझाबेथला एक चांगली बातमी कळली. 'लिडिया फोल्डर', अमेरिकेत जन्मलेली पहिली स्त्री डाक्टर झाली होती. तिच्यानंतर एलिझाबेथची लहान बहिण एमिलीने डाक्टर बनण्याचा मनसुबा जाहीर केला.



# हास्पिटलची स्थापना

१८५१ मधे एलिझाबेथ ब्लैकवेल न्यू-यार्कला परतली. गरीबांची मदत करणे हीच तिची इच्छा होती. सुरवातीला तिचा वैद्यकिय व्यवसाय चालला नाही. लोकांचा महिला डाक्टरवर विश्वास नव्हता. लेकांची मन महिला डाक्टराविषयी पूर्वग्रह दूषित होती.

पण हळूहळू स्त्रिया डा. एलिझाबेथकडे उपचार करून घेण्यासाठी येऊ लागल्या. "आम्ही तुमच्याकडे आधीपासून का आलो नाही? तुम्हीपण वैद्यकिय शिक्षण घेतले आहे" असे बोलणे तिला महिलाकडून वारंवार ऐकू येऊ लागले.

१८५३ मधे एलिझाबेथने गरीब महिला व मुलांसाठी एक नवीन दवाखाना सुरू केला. या कामात डा. एलिधाबेथच्या धाकटी बहिण, एमिलीची मदत झाली.

१८५४ मधे एमिली डाक्टर झाली. दोनहि बहिणीनी हास्पिटल सुरू करण्यासाठी आपल्या श्रीमंत मित्रांची मदत मागितली.

१८५७ मधे डा. एलिझाबेथ व डा. एमिली यांचे स्वप्न साकार झाले. त्यांनी महिला व मुलासाठी असलेल्या हास्पिटलची स्थापना केली. ते जगातील पहिले हास्पिटल होते जे पूर्णपणे महिला चालवित होत्या.

तेथे फक्त गरीबांवर इलाज होत नव्हते तर परिचारिका प्रशिक्षण सुरू  केले. एक अश्वेत डाक्टर रेबेका कोल याही तिच्यासोबत कामाला लागल्या. त्यांनी अमेरिकेतील सर्व शहरात 'व्हिजिटींग डाक्टरची' सेवा सुरू केली.





१८६८ मधे हास्पिटलने महिलांना प्रशिक्षित करण्यासाठी स्वत:चे वैद्यकिय विद्यालय सुरू केले. त्यानंतर एके दिवशी डा. एलिझाबेथ ब्लैकवेल यांना इंग्लडवरून आलेले पत्र मिळाले ज्यामधे त्यांनी अमेरिकेत जे काम सुरू केले आहे तसेच काम इंग्लंडमधे सुरू करावे अशी विनंती करण्यात आली होती.

१८६९ मधे हास्पिटलचा सारा कार्यभार त्यांची बहिण, डा. एमिलीवर सोपवून एलिझाबेथ इंग्लंडमधे परतली. तिथे तिने ४० वर्ष कसोशीने काम केले. "महिलांचे हक्क" यावर प्रखरपणे बोलणारी व्यक्ति म्हणून ती सर्वाना माहित झाली.

३१ मे १९१० मधे ती मरण पावली.

**समाप्त**